इत्यर्थ

फेब्रुवरी २०१४

संपादक:

सृजा (औरंगाबाद)



.

संपर्क: ई-साहित्य प्रतिष्ठान

जी-११०२, अकरावा मजला,

ईटर्निटी, तीन हात नाका,

इस्टर्न एक्स्प्रेस हायवे,

ठाणे पश्चिम. ४००६०४.

मो. ९८६९६७४८२०

वेबसाईट : www. esahity. com, etyarth. blogspot. in

ईमेल: esahity@gmail. com, etyarth. esahity@gmail. com.

संपादकीय

नमस्कार रसिकहो

तुमच्यापैकी बऱ्याच लोकांच्या मनात हा विचार येत असेल की ई-साहित्य वाल्यांचं नेमकं काय सुरू आहे? कधी अंक कधी काढतात कधी नाही. कधी तुमच्यापर्यंत पोहोचतात तर कधी नाही.. म्हणूनच हा खास लेखनप्रपंच.

इत्यर्थ सुरू करण्यापाठीमागे मुद्दा हा होता की ई-माध्यमात जे लेखक नवे आहेत त्यांना हक्काचं व्यासपीठ मिळावं. एका क्लिकसोबत सगळया जगात पोहोचता यावं. माहितीच्या महाजालात स्वतःची आगळी ओळख मिळवता यावी. इत्यर्थ याच हेतूने आजवर चाललं आहे आणि यापुढेही चालेल. अंक काढावा लागतो म्हणून काढणं आणि जे मिळेल ते छापणं हे इत्यर्थ कटाक्षानं टाळायचा प्रयत्न करेल. तसंच जर संपादक स्वतःच्या कार्यबाहुल्यामुळे जर संपूर्ण लक्ष इत्यर्थ कडे देऊन त्याच एक दर्जेदार पुस्तक बनऊ शकत नसतील तर उगाचच थातूरमातूर काम करण्यातही काही अर्थ नाही. त्यामुळे इत्यर्थ सगळया नव्या लेखकांचं एक व्यासपीठ या नात्यानं मनापासून स्वागत करीत आहे.

फेब्रुवारी महिना म्हणजे ऋतूबदल. गरमीची चाहूल आता लागू लागेल आणि गुलाबी थंडीच्या शेवटच्या काही दिवसात प्रेमी जिवांचा व्हॅलेंटाईन्स डे येईल. तो दिवस कुणी खुल्लमखुल्ला तर कुणी लपूनछपून आपल्याच दुनियेत साजर करतील. हा सोहळा सरत नाही की महाराष्ट्रभरात शिवजयंतीच्या मिरवणुकांची धूम असेल. राजांच्या बद्दलच्या अभिमानानं आणि प्रेमानं आमचं ऊर भरून येईल. हर हर महादेव च्या गर्जना होतील.

शाळा आणि कॉलेजांमध्ये मात्र तयारी सुरू असेल ती २८ फेब्रुवारी अर्थात राष्ट्रीय विज्ञान दिनाची. लहान लहान हातांनी बनवलेली मोठमोठ्या स्वप्नांची मॉडेल्स विज्ञान प्रदर्शनांतून मांडली जातील. वैज्ञानिक वृत्ती, हस्तकला, तर्कशास्त्र आणि ते उत्तम रितीने मांडण्यासाठी सादरीकरणाचे हातखंडे यांचा एवढा सुंदर मिलाफ इतर कुठे पहायला मिळत असेल असं वाटत नाही.

तर असा फेब्रुवारी दहावी बारावीच्या परीक्षांमध्ये संपता संपता तुम्हाला खूप आनंद देवो हीच आशा.

सृजा

# प्रेमाच्या गावा जावे.

बापुसाहेब सोनवणे.

पक्या आणि पिकीं म्हणजे आमच्या भागातील हिर आणि रांझा. दोघांचेही प्रेम प्रकरण म्हणजे थरारक घटनांनी भरलेली मालिकाच. असे असूनही त्यांच्या जिवनावर कुणी लेखकु किंवा शाहिरुने महाकाव्य कसे लिहीले नाही याचे नवल वाटल्यास नवल नाही. असा विचार करुन मीच त्या आधुनिक प्रेमप्रकरणाला मराठी साहित्यात अजरामर करायचे ठरवले.

आडदांड वाटणारा भानुप्रकाश काळे. वय वर्ष पंचवीस. शाळेत असताना अभ्यासासारख्या



फालतू गोंष्टींकडे लक्ष द्यायचा नाही. मारामारीत पक्याचे नाव नसेल तर तिला मारामारी म्हटलेच जात नसे. आणि पिंकी दांडगे. वय वर्षअठरा. काळे आणि दांडगे कुटूंब सख्खे शेजारी. दांडगे कुटूंबात बशी पडली तर आवाज काळे कुटूंबात यायचा. आणि काळे फॅमिलीत मासे तळले तर त्याचा वास दांडगे कुटूंबात जायचा. इतकेच दोन घरांत अंतर.

पक्या व पिंकीच्या प्रेमाला कशी सुरवात झाली हे दोघांनाही कळले नाही. परंतु त्यांच्या प्रेमाला हातभार लावला नगरपालिकेच्या खड्ड्याने. नगरपलिकेचा कारभार म्हणजे कारभारच असतो. पहिल्याने रस्त्यांचे डांबरीकरण करायचे आणि मग टेलिफोन,नळ यांसाठी डांबरीकरण तोडायचे. मनात प्रश्न पडतो की खड्ड्यांसाठी डांबरीकरण की डांबरीकरणासाठी खड्डे? ते काहीही असो, पक्या पिंकीच्या प्रेमात या खड्ड्यांचा फ़ार मोलाचा वाटा. त्याचे असे झाले, एकदा संध्याकाळच्या वेळेला पिंकी आपल्याच तंद्रीत चालली होती. पिंकीचे चालणे म्हणजे चालणे होते कि उड्या मारणे हे फक्त तिलाच ठाऊक होते. चालताना तिने दोन बुजुर्गांना

म्हशीने द्यावा तसा धक्का मारला होता. वरुन त्यांनाच “कायरे,म्हाता-या डोळे फुटले काय तुमचे? मुलीला बघून धक्का मारताय. ” असा हाग्या दम भरला होता.

परंतु रस्त्यातल्या बिचा-या खड्ड्याला तिच्या दमाची कल्पना नसावी आणि अवचित तिचा पाय नळाच्या मेनहोलमध्ये गचकन गेला. तशी ती किंचाळत म्हणाली,”अगं आई गं हे मेनहोल आहे की मॅनहोल. नालायकांना जराही कळत नाही रस्त्यात खड्डे ठेऊ नयेत म्हणून”. ती नगरपालिकेला शिव्या हासडत पाय धरुन विव्हळू लागली. आपल्या हिंदी सिनेमात जसा नायक नायिकेच्या संकट्समयी अचानक अवतरतो आणि दहावीस गुंडांना बकलून कढतो तसाच पक्या त्या ठिकाणी अवतरला.



पण त्याच्या शुरपणाला आव्हान द्यायला कुणी नव्हता तिथे. तिथे होता एक खड्डा. आणि त्या खड्ड्याला तो बकलू शकत नव्हता. तो धावतच पिंकीजवळ गेला.

“काय,झाले पिंके”

”अग,आई ग”

”काय,आई पडलीय का खड्यात?”

”आई कसली,माझाच पाय अड्कलाय मेनहोलात. मला उभेही राहता येत नाहीये. अग,आई गं”

”अग,मग इतकी का घाबरतेस? मी आहे ना त्यासाठी”. आणि तो तिचा हात ओढू लागला.

”पक्या, तुला डोके हाय का नाही? माझा हात नाही पाय अडकलाय मेनहोलात. अगं आई गं ”ती विव्हळत होती.



"अरे हो. " असे म्हनत तो पटकन जमिनीवर बसला. त्याने थरथरत्या हाताने त्या नाजूक पायाला स्पर्श केला. व हळूहळू पाय वर काढू लागला. रस्त्यात मेनहोल ठेवणा-या नगरपालिकेला व त्या मेनहोलांची झाकने चोरणा-या टोळीला त्याने सहस्रदा धन्यवाद दिले. अखेर त्याने पिंकीचा पाय वर काढला. पण ती तर ऊभी ही राहू शकत नव्हती. ती जमिनीवर बसून "अग आई ग़ं,अग आई गं "करून विव्हळत होती. तसा पक्या तिला म्हणाला. "पिंके,किती वेळ इथे विव्हळणार कुत्र्यासारखी. "

"ये कुत्र्या, कुत्रा कुणाला म्हणतोस? मला उभे तरी राहता येतंय का? अगं, आई गं" ती पाय चोळत विव्हळत होती. "अगं, मग इथे किती वेळ बसणार विव्हळत. माझा हात पकड,मी पोहचवतो तुला घरी. "हो ना हो ना करत पिंकी त्याच्याबरोबर जायला तयार झाली. त्याने हळुच त्या मेनहोलाला नमस्कार केला. आणि त्या गोड ओझ्याला घेऊन घरी निघाला. पण त्याच्याआधीच ती बातमी चाळीत पसरली होती. नविन नवरानवरीच्या स्वागताला जसे लोक गर्दी करून ऊभे राहतात तसे चाळीतले सारेजण आपापल्या दारात येऊन आनंद लुटत होते.

पक्याने एखाद्या लढाईत मोठा विजय मिळवून आलेल्या वीराप्रमाने चाळीत प्रवेश केला. तशी पिंकीची आई कडाडली,"सोड,मेल्या,सोड माझ्या पोरीला. काही लाज शरम आहे की नाही काही तुला?खुशाल ऊचलून घेऊन आलास माझ्या पोरीला. सोड आधी,सोड तिला. "

"पिंकीची आई मी सोडील तिला, पण,तिने मला सोडायला हवे ना. अहो काकी,तिचा पाय लचकलाय. त्याचं काय करू?"आता हा बिनलाज्या पोरगा आपल्या पोरीचा पायही हातात घ्यायला कमी करणार नाही हे ओळखून पिंकीची आई म्हणाली,"मी बघते तिचा पाय,पन पहिला तू आपल्या घराचा रस्ता बघ. " पिंकीची आई अगदी हातघाईवर आली होती. तसा




पक्या म्हणाला,"पिंकीची आई,अहो,तुम्ही तिला धरताय की देऊ सोडून खाली?तिला उभे राहता येत नाहीये. "पिंकीची आई पुढे झाली. तिने पिंकीला हळूच धरले. पिंकीवर एक नाजूक कटाक्ष टाकून पक्याची स्वारी आपल्या घरी आली. दारात पाय ठेवताच पक्याची आई कडाडली,"पक्या,मेल्या काही लाज शरम आहे की नाही?"

"काय केलं मी?"

"काय करायच बाकी ठेवलंस मेल्या? तरणी ताठी पोरगी खुशाल उचलून घेऊन आलास?"

"काय करणार, तुच तर नेहमी म्हणतेस माणसाने शेजारधर्म पाळावा म्हणून. "

"असा शेजारधर्म नव्हता सांगितला पाळायला. शेजारधर्म पाळायला गेला होतास कि शेजा-याची पोरगी पळवायला गेला होतास. "त्याची आई अजूनही काहीबाही बडबड्त होती. पण पक्या आणि पिंकी भूतलावर होतेच कोठे?ते तर केव्हाच स्वर्गात पोहचले होते.

आणि त्या दिवशीपासून आमच्या भागातील मंडळींना नव्या प्रेमकहानीचे नवे नवे अंक वेगवेगळया ठिकानी दिसू लागले. चहाटळ रमाकाकू म्हणाल्या त्यांनी पक्या व पिंकीला जिन्याखाली अंधारात पाहिले. तर रम्या देशपांडेने याच जोडीला पिक्चरच्या थेअटरमध्ये पाहिले. पिंकीची कपडे वाळत घालण्याची व पक्याची दात घासण्याची वेळ योगायोगाने एक येवू लागली. कधीही काम न करणारा पक्या आताशा गिरणीतून दळण आणताना दिसू लागला. पण त्याच वेळी पिंकीचेही दळण गिरणीत असायचे हा फ़क्त योगायोग असायचा. पक्या व पिंकीने या काळात इतके हिंदी सिनेमे पाहिले कि प्यार किया तो डरना क्या सारखी त्यांची

अवस्था झाली होती. त्यांचे तमाम शेजारीपाजारी मंडळी, स्वःताचे जन्मदाते त्यांच्या दृष्टीने खलनायक ठरले होते.

आताशा पिंकी पक्याच्या वागण्यावर त्यांच्या आईवडलांनी त्यांच्यांवर खुपच बंधने घातली होती. त्यामुळे त्यांना भेटणे मोठे मुष्किलीचे झाले होते. एके दिवशी पिंकिला दोडक्यांच्या घरात शिरताना पक्याने पाहिली. यापेक्षा मोठी संधी कोणती मिळणार होती. तो त्यांच्या दरवाजाबाहेर अंधारात दबा धरुन बसला. इतक्यात पावलांचा व तोरड्यांचा छुमूक छुमूक आवाज जवळ आला. आवाज बाहेर येताच, अंधारात दबा धरुन बसलेल्या पक्याने बोक्यासारखी झडप घातली. पण हाय रे दुर्दैवा, त्याच्या झडपीत पिंकीच्या नाजूक हाताऐवजी दोडकेकाकूंचा दोडक्यासारखा हातच सापडला. क्षणभरच, अचानक झालेल्या हल्ल्याने गांगरलेल्या दोडकेकाकूंनी पक्याचा एक हात घट्ट पकडलाआणि त्याच्या पाठीत दोन सणसणीत रट्टे लगावले . काकींचा हात म्हणजे हात नाही तर हातोडा असावा असा भास क्षणभर पक्याला झाला. दोन हातोडे पाठीत पडल्याने त्याला मोठ्याने ओरडावे वाटले पण ओरडणार कोणत्या तोंडाने. मोठ्याने ओरड्णे म्हणजे मोठ्या माराला आमंत्रण देण्यासारखेच होते. 'तोंड दाबून बुक्क्यांचा मार' कशाला म्हणतात हे पक्याला पक्के कळले होते.



काकू अस्सल गावरान कोल्हापुरी शिव्या घालत होत्या. "भाड्या, माझा हात धरलास आज. आज मी तुला जित्ता सोडत नाही बघ". असे म्हणत काकूने अजून दोन लाथा त्याच्या कमरेत घातल्या. पक्याने ओळखले, प्रसंग आणिबाणीचा आहे. आडला पक्या,काकूंचे पाय धरी. त्याने पट्कन काकूंचे पाय पकड्त म्हट्ले",काकू चुकले माझे. अजून दोन लाथा मारा हवा तर,पन

ओरडू नका बघा. फक्त एकदा माफी करा. मला वाटले पिंकीच आली म्हणून चुकून तुमचा हात पकडला मी". पक्याने काकूंचे पाय घट्ट पकडले होते. व तो अक्षरश: थरथरत होता.

"मेल्या आधी माझे पाय तर सोड. तरच सोडता येईल ना मेल्या. माझे पाय सोड आधी". आपण काकूंचे पाय पकडलेले आहेत हे पक्या विसरूनच गेला होता.

"तुम्ही ओरड्णार नसाल तरच पाय सोड्तो बघा". वाघासारखा असणारा पक्या,सशासारखा थरथरत होता. बिचा-या काकूंना त्याची दया आली. त्या त्याला म्हणाल्या,"अरे बाबा,नाही वरडत. पन पाय तर सोड माझे". सापळयात अडकलेला ऊदिरमामा जसा दार ऊघडताच जोरात बाहेर पळतो तशीच पक्याने काकूंचे पाय सोडून धूम ठोकली. गडबडीत त्याच्या पायातील एक चप्पल तिथेच पडली. आपण फक्त एकाच चपलेवर पळतोय याचे भानही त्याला राहिले नाही. त्याने मनात विचार केला,पाय सलामत तो चप्पल पचास. पळताना रस्त्यात झोपलेली दोन कुत्री,तीन मांजरे,मोहित्यांचा बंटी यानांही पायाखाली तुड्वले. पण त्याने मागे वळून पाहीले नाही.

अचानक अंगावर पाय पड्ल्याने पिसाळलेली कुत्री भो भो करत त्याच्या मागे लागली होती. त्यांच्या भुंकण्याने सारा परीसर दणाणून गेला होता. आपल्या भाईबंदांच्या भुंकण्यात गल्लीतली सारी कुत्री सामील झाली होती. एका पक्यामागे दहा कुत्री असा आगळा वेगळा सामना त्या ठिकाणी रंगला होता. पक्याला पहिला कोन पकडतो यात कुत्र्यांमध्ये चांगलीच शर्यत लागली होती. पहिला नंबर पटकवण्यासाठी जसा खेळाडू वेगाने धावतो तसा पक्या वेगाने धावत होता.




इतक्यात त्याला एका घराचा जिना दिसाला. त्याच्या जिवात जिव आला. पळतच धाडधाड तो घाईतच जिना चढू

लागला. पण हाय रे दुर्दैवा, पक्याच्या जोरात पळण्याने जिन्याच्या दोन पाय-या काडकन मोडल्या. जिन्याची एक कड हातात आली म्हणून पकया वाचला. नाहीतर मरतच होता. पाय-या तुटल्याचा आवाज आला तसा सदा पहिलवान बाहेर आला. तिरसट स्वभावाच्या सदा पहिलवानाने आपल्या गलेलठ्ठ मिशांवरून हात फिरवला. त्याने एकदा तुटलेल्या पाय-या व एकदा पक्याकडे रागाने पाहिले. राक्षस म्हणजे काय असतो हे पक्या प्रत्यक्ष बघत होता. पक्या परत खाली पळणार तोच सदा पहिलवानाने पक्याचे बकोट पकडले आणि विचारले “कोणाच शिंगरू रे तू. “

मी राम राम काळ्यां चा मुलगा पक्या. गडबडीत तो रामराव ऐवजी रामराम बोलून गेला.



“कोकलीच्या,एव्हढ्या जोरात कुठे चंद्रावर निघालास होय रं. माज्या दोन पाय-या तोडल्यास. माला आता काही ठाऊक नाही. माझा जिना आता रिपेर करुन दे. ”

“काका आता माझ्याकडे पैसे कुठे आहेत? मी घरी जाऊन पैसे घेऊन येतो. ”

“माला शेंडी लावतोस व्हय. म्या तुला घरी जाऊ दिले तर ना. पयले पैसे मंग घर समजलास. ”

पक्याला कळून चुकले आता पैशाशिवाय सुट्का नाही. तिकडे आग तर इकडे वाघ अशी त्याची अवस्था झाली होती. इतक्यात त्याला आठवले त्याच्या वडलांनी त्याला लाइट बिल भरण्यासाठी त्याला पैसे दिले आहेत. पहिली या राक्षसाच्या तावडीतून सुटका करून घेणे गरजेचे होते. त्याने मुकाट्याने पैसे काढून दिले. व घरी आला. काकीने कमरेत घातलेल्या घातलेल्या लाथांच्या वेदना आता जाणवत होत्या. असेच आठ दहा दिवस निघून गेले. पण पक्याला काही चैन पडत नव्हती. पिकींला कोठे व कसे भेटायचे. याच्याशिवाय त्याच्या डोक्यात कोणतेच विचार शिरत नव्हते. त्या भागात प्रेमी जोड्यांसाठी प्रशिद्ध असलेल्या ,राजाराणी पार्क,चा लौकीक त्याच्या कानावर आला. पिंकीला घेऊन एकदा त्या पार्कला भेट द्यायचीच असा निश्चय त्याने केला. आणि तशी संधीही त्याला चालून आली.

एकदा असाच तो पिंकीच्या मागावर होता. पिंकीही अशाच शोधात होती. एक दिवस संधी साधून ती बाहेर पडली. तिने आईला मोठ्या आवाजात म्हटले “,आई मी क्लासच्या पेपरला निघाले गं. ” पकयाला सांकेतीक भाषा बरोबर समजली. भिका-याला लॉटरी लागावी तसे त्याच झाले. तो हळुच तेथून निघाला. गल्लीच्या चिंचोळया जागेत त्याने तिला गाठले. किती दिवसांनी पिंकी त्याला भेटत होती.

“चल “ त्याने म्हट्ले. पिंकी तयारच होती. पक्याने रिक्शाला हाक मारली. दोघेही रिक्शात बसली. राजाराणी पार्क येताच दोघेही खाली ऊतरली. पिंकीला घेऊन त्याने बागेत प्रवेश केला. एक ब-यापैकी झुडूप बघून दोघेही त्याच्या आडोशाला बसली. पक्याने तिचा हात प्रेमाने हातात घेतला. तो लाडात येऊन म्हणाला “ पिंके माय डार्लींग, किती दिवसांनी भेटतेय गं. मेरे दिलकी धडकन. मी तुझ्या प्रेमाने अगदी पागल झालोय गं. ”

“ते कळलं मला. जेव्हा तू काकूंच्या लाथा खाल्ल्या तेव्हाच. ”ती फिदीफिदीकरून हसू लागली.

“अरे कोई बात नही.  दोन लाथांनी काही फरक पडत नाही मेरी जान. हम तुम्हारे लिए अगले जनम तक लाथा खानेको तैयार है. ”

“पकड्या ते सगळ खरं रे. पण आता लवकर काहीतरी करायला ह्वे नाहीतर , आपल्या दोघांचीही लग्ने होतील. पण दुस-यांबरोबर. ”

“नाय पिंकी दुनियाकी कोई भी ताकद हमे जुदा नही कर सकती”.

“पन पक्या तो डायलॉग आता जुना झालाय रे. ”

“पन मला तर तोच पाठ आहे ना “. दोघांचेही फिल्मी डायलॉग अगदी रंगात आले होते.



हवालदार वाघमारेंना पार्कात बरेच गि-हाईके मिळण्यासारखी होती. पक्यासारख्या नवख्या मंड्ळींना कायद्याचा धाक दाखवून त्यांनी बरीच माया गोळा केली होती. शिवाय मामला चोरीचा असल्याने कुणी तक्रार करायचा प्रश्नच नव्हता. तेरी भी चूप मेरी भी चूप. त्यांची गिधाडनजर आज पक्या व पिकींवर पडली. त्यांनी हळूच पक्याच्या खांद्यावर हात ठेवला.

आपल्या खांद्यावर कुणीतरी भिका-याने हात ठेवला असावा असे समजून पक्याने हात झटकला. व एक कोकणस्थ छान शिवी दिली. पक्याच्या अनपेक्षित हल्ल्याने हवालदार येड्बाड्लाच. त्याने पक्याची कॉलर धरून त्याला उभाकेला. चारपाच चांगल्या पोलिसी शिव्या हासडल्या. व म्हणाला" साहेब चुकलो बघा. चुकून शिवी दिली. " हवालदाराने सणकन त्याच्या तोंडात भड्कवली.



"चुकून शेण नाही खाल्लेस? आता चला पोलिसचौकीवर. " पोलिसचौकीचे नाव घेताच पक्याच्या पोटात गोळा आला. प्रेमासाठी त्याने काकूंच्या लाथा खाल्ल्या होत्या. हवालदाराची तोंडातही खाल्ली होती. पण आता पोलिसचौकीची हवा खायची म्हणजे. प्रकरण परत वाढणार. त्याने तहाचा मार्ग स्विकारला. साहेबांचे पाय पकड्त तो म्हणाला " साहेब चुकले आमच्याकडून. फक्त एकदा सोडा. परत चुकून सुद्धा चुकणार नाही. "

"परत चुकणार नाही म्हणतोस?" हवालदार त्याचा आदमास घेत म्हणाला.

" गळयाशपथ. चुकून सुद्धा या बाजूला येणार नाही. "

"ठिक आहे. हजार रुपये दंड भर. सोडतो तुम्हा दोघांना. "

हज्जार पक्या टाणकन जागेवर फुट्भर ऊडाला.

"तुमचा पहिला गुन्हा म्हणून हा रेट. "

"तरी मी तुला सांगत होते पार्कात नको म्हणून. आता आली का नरकात जायची वेळ,"पिंकी म्हणाली. पक्याने खिशात हात घातला दहा रुपयांची नोट हाताला लागली. त्याने ती हवालदारांसमोर धरली. हवालदाराने त्याची मानगुट पकड्ली. व म्हणाला " तू काय मला रस्त्यावरचा भिकारी समजलास काय?चल आता गुमाने पोलीसचौकीवर. " पक्या व पिंकीची वरात हवालदाराच्या मागून चौकीवर पोहचली.

पोरांकडून नाही तर त्यांच्या आईवडिलांकडून तरी काही मिळतय का?याचा विचार हवालदार करत होते. इकडे पक्याला घाम फुट्ला होता तर पिंकी मात्र बिनधास्त होती. आता आपली सुटका केव्हा होणार याकडे दोघांचे लक्ष लागले होते. हवालदाराने दोघांच्याही घरी फोन




लावला. पोरांनी काय लफडे वाढवले याचा विचार करत करत त्यांचे आईवडिल पोलिसचौकीत हजर झाले. पक्याला तर बापाकडे बघायचा    धीरच होत नव्हता. हवालदाराने दमदार आवाजात विचारले " ही कार्टी तुमचीच काय?"

" व्हय सायब आमचीच हायती. काय केलं पोरांनी? "

"काय करायच बाकी ठेवलय? सार्वजनिक ठिकाणी नको त्या गोष्टी करताना पकड्लेय त्यांना". तशी पिंकीची आई नव-यावर उसळली "तरी मी तुम्हाला सांगत होते पोरीचे लग्न करून टाका म्हणून. पन माझ ऐकत कोन. बघा,बघा पोरगी वरात कशी पोलीसचौकिवर घेऊन आली ते. " पोरीने नाक कापलं गं म्हणत तिने तिथेच गळा काढला.

तसा हवालदार ओरडला "चुप.  एकदम आवाज बंद. आवाज नाय पायजे.  पोरं नको ते धंदे करतात आनी तुमचे लक्ष नाही. पोरं सांभाळता येत नाहीत. पोरांऐवजी तुमच्यावरच गुन्हा दाखल कराया पायजे. "

तसा पक्याचा अनुभवी बाप हवालदाराकडे गेला. हळू आवाजात म्हणाला " साहेब जरा मिटवायच बघा की. "

" मिटण्यासारखे राहिले नाही आता,केस फाईल केलीय. "

" पर साहेब,केस तुम्हीच फाईल केलीय,तुम्हीच ओपन करा की. तुमचा चायपानी देऊ कि आम्ही. "

हवालदाराने विचर केला योग्य वेळ आहे तो म्हणाला "अस म्हणता?"

"तर काय व्हो. "

"पाव्हन एक बोलू. तुम्ही आपली माणसं. तव्हा रुपये दोन हजार भरा व घेऊन जा पोरांना. "

हो ना हो ना करता पक्याचा बाप हजार रुपयांना तयार झाला. पण हवालदार काही ऐकेना. तसा पक्याचा बनेल बाप उसळला. तर ठिक हाय हवालदार साहेब राहूद्या पोरं जेलात. नाहीतरी कार्ट्यांनी आमची नाकं कापलीच हायेत. भोगू  द्या शिक्षा बांबलीच्यांना. अस म्हणून पक्याचा बनेल बाप निघाला देखिल. हवालदाराने ओळखले आता जास्त ताणण्यात ,अर्थ, नव्हता. नाहीतर तेलही जाणार आणि तुपही जाणार. त्याने पट्कन पिंकीच्या बापाचा हात पकड्त म्हटले “आवो पाव्हण येड का खूळ. आस हातघाईवर येवू नका. तो हाय पोराचा बाप. त्याची थोडीच आब्रू जाणार?तुम्ही पोरीचे वडिल. तुमच्याकडे बघतो. आणा हजार तर हजार. ”

“आवो पर पैसे माझ्याकडं कुठलं आलं. थांबा मी पक्याच्या बापाला घेऊन येतो. ” पक्याचा बाप परत आला पण आता त्याने हवालदाराची अडचण ओळखली होती. त्याने आपले एकच पालुपद लावून धरले राहू द्या पोरं जेलमध्ये.

आता हवालदार फारच नरम आला होता. तो समजुतीने म्हणाला “आवो पाव्हणं,पोरंच ती. या वयात चुकणारच. पन मी काय म्हणतो पाटील, राहीले हजार पण पाचशे रुपये तरी भरावेच लागतील. मला कवडी नको पर मोठ्या सायबाला निवद दाखवावाच लागेल बघा. ”

पक्याच्या बापाने बघितले सौदा आता आटोक्यात आला होता. त्याने शंभर शंभरच्या पाच नोटा हवालदाराच्या हातात कोंबल्या. सर्व जण जरा निवांत झाले. तसा हवालदार म्ह्णाला “काळे पाटील दांड्गे पाटील एक बोलू का?”

“बोला की सायब बोला. ”

“पोरांचा फारच जीव हाये एकमेकांवर. ”

“पाचशे दंड भरलाय की त्यापायी. ”

“पैशांच जाऊ द्यावो.  दोघांचे लग्न का नाही करून टाकत?”

तसा पक्याचा बाप म्हणाला “सल्ला वाईट नाही तुमचा. पण दांडगे पाट्लांचा विचार कळायला हवा ना. ”

“आता कसला विचार करत बसू? जास्त विचार करत बसलो तर घरात नातु येईल. टाकू की ऊरकून बार. व्हऊ द्या पोरांच्या मनासारखं. ”

तारीख पक्की करुनच मंडळी तेथून निघाली. हवालदारसाहेबांना पहिले निमंत्रण होते. लग्नात सर्वांनी पक्याला नाव घेण्याचा आग्रह केला. पक्याने नाव घेतले “नाव घेतो पिंकीचे मान तुमचा ठेऊन,माणसाने रस्त्याने चालाव नेहमी खड्डे बघून. ” तसा हाश्याचा मोठाच फवारा ऊडाला. आता पिकीला नाव घेण्याचा आग्रह झाला. तिने पक्याचे पक्के ऊट्टे काढले. ती म्हणाली “प्राणांवर आलेले,लाथांवर निभावले,कुत्र्यांच्या हल्ल्यातून मात्र प्रकाशराव बचावले. ”यावर फ़क्त दोड्केकाकू खळखळून हसल्या.



# ॐ नम:शिवाय

अनिल पाटील

संध्याकाळ होत आली होती.  रस्ते वाहनांनी फुलून गेले होते,दिव्यांच्या झोतांची पकडा पकडी जोरात सुरू होती. आमची गाडी  , वाहने आणि खड्डे चुकवत    कोईंबत्तूर शहरा पासून दुर दूर जात होती.

जवळ जवळ चार वर्षां पूर्वी मी एक ई मेल पाहिली होती, ती आता प्रत्यक्ष पहाण्याची संधी जवळ येत होती.  ई मेल मधील तो भव्य नंदी, तो गूढ घुमट त्यातील शंकराची ती उंचच उंच पिंडी मला साद घालत होती.   बाजूची माडबने मागे सरत होती व मन सरसावून पुढे धावत होते.  मनात उत्साहाच्या लाटा उसळत होत्या.     ओठांतून नकळत जप चालु झाला,ॐ नम: शिवाय:,ॐ नम: शिवाय:.

खरं तर निघायला उशीरच झाला होता. संध्याकाळचे सहा वाजत आले होते. पण आता दिवस लहान होत होता,त्यात आकाशात ढग जमलेले. म्हणून रस्त्यावरचे दिवे लागले होते. हा ईंडस्ट्रीयल झोन, कारखाने सुटलेले वाहनांची,माणसांची एकच गर्दी उसळलेली. जो तो जीव तोडून घराकडे धावत होता. त्यातून आमची मोटार  ड्रायव्हर हळू हळू पुढे काढत होता.

दक्षिणेत भाषेची मोठी अडचण होते. चालक साहेबांना तामिळ शिवाय दुसरी कुठलीच भाषा येत नव्हती. पण तरीही आमची चांगली गट्टी जमली होती. आमची भाषा आम्हाला चांगलीच समजत होती. उदाहरणार्थ चालक साहेब वदले;” I go ,but no go,,you go so I go” म्हणजे मला जायचे होते, पण जमत नव्हते.तुम्ही जात अहात, म्हणून मलाही जायला मिळते आहे. मग कळले की तो शिवभक्त आहे. ध्यान मंदिरातील शिवलिंगाच्या दर्शनाच्या कल्पनेने तो फुलून गेला होता व अशा अडचणीच्या वेळी देखील तो उत्साहाने गाडी चालवीत होता.

आजूबाजूला रस्त्याच्या दोन्ही कडे टिपिकल तामीळ वातावरण होतं.अम्मा म्हणजे जयललिता व करुणानिधी(म्हणजे नावात सुध्धा 'निधी'!) ह्यांचे मोठे मोठे कटाउटस लागलेले. मधे रजनीकांत त्या दोघांकडे पाहून फिदीफिदी हसतोय. भडक व कडक तामीळ चित्रपटांची पोस्टर्स लावलेली. बाकी सर्व घडीच्या लुंग्या व पट्टेदार साड्या. गाणी ही लागलेली.

गाव संपताच मस्त झाडी लागे. मग दूरवर डोंगरकडा दिसूलागल्या. पाऊस ताशा तालात नाचत होता. जंगल,भव्य टेकड्या,पाऊस, सर्व वातावरण मस्तच मस्त होतं. आम्ही आमच्या भाषेत बोलत होतो. ड्रायव्हर पुट्टु सामी (स्वामी) काहीतरी सांगत होता. त्यात जग्गी वासुदेव हे नाव दोन तीनदा आलं. त्याचा संदर्भ नंतर कळला. तो पुढे येईलच.

मध्येच त्याने गाडी थांबवून हाका मारल्या. एक दोन घडीच्या लुंग्या अधिकच लहान झाल्या व आमच्या दिशेने आल्या. कडाडा भांडणं झाली.मी हादरलोच. पण भांडण थांबली. पट्टु माझ्या कडे पाहून समाधानाने हसला, व म्हणाला " मी म्हणतच होतो ना हाच रस्ता बरोबर आहे ते. आता उजवीकडे वळले की फक्त सहा किलोमिटर गेले की मंदिर आलेच."

माझी ट्युब नेहमी प्रमाणेच लेट पेटली. दोन गोष्टी लक्षात आल्या. पहिली म्हणजे ते भांडण नसून पुट्टू त्यांना रस्ता विचारत होता, व ते वाट दाखवत होते. दक्षिणेत हेच होते.मराठी पेक्षा सर्व भाषा "extra strong!" कानात खडखडतातच. दुसरी गोष्ट म्हणजे पुट्टू इतक्यावेळ जे बडबडत होता ते तो हाच रस्ता बरोबर आहे हे सांगत होता. मी भाबडे पणाने मुंडी हलवत होतो. मी आयुष्यात हजार वेळा निश्र्चय केला आहे,की आपल्याला नक्की कळल्या शिवाय मान हलवायची नाही म्हणून. पण दर वेळेला सिगरेट सोडायची ह्या निश्र्चयाच जे होतं, तेच नेमकं इथं ही होतं. असो.

गाडी मुख्य रस्ता सोडुन आता उजवी कडे वळली आणि पाऊस जोरात सुरु झाला. रस्ता चिखलात लडबडला होता. आता दिवेही नव्हते. दोन्ही बाजूला दाट झाडी लागली. ड्रायव्हर धीराचा. तो गाडी शांत पणे पुढे हाकत होता. इतक्यात मला डावीकडे पाटी

दिसली,तिथे तामिळ व ईंग्रजीत लिहीले होते, “ जंगलात फिरू नये,हत्ती मोकळे आहेत. ” मी दचकलोच! डिस्कव्हरी वर पाहिलेले अनेक प्रसंग आठवले. हाच तो प्रसिध्द वेलियानगिरी टेकड्यांचा तळ. ह्या जंगलात हत्ती व इतर प्राणी भरपूर आहेत. फारसे टेन्शन न घेता पुढे सरसावलो. चिखलाने कहर केला होता. आता दूर दिवे दिसूलागले. आश्रम आला सुध्दा.

पिवळ्या मलूल प्रकाशात दोन दुकाने उघडी होती. एक पूजा साहित्याचे तर दुसरे चहाबिडीचे. गाडी पार्क करुन पचाक चिखलातून आश्रमाच्या प्रवेशद्वारा जवळ आलो. इथ पर्यंत साधे सरळ होते. पादत्राणे ठेवून जाणार इतक्यात सूचना मिळाली मोबाईल बंद करण्याची. सुरक्षा रक्षकाने जवळ उभे राहून तो बंद केल्याची खात्री केली व नंतरच आत सोडले.

त्याच विचारात चालत होतो. जेम तेम दहा पावले चाललो असेल, समोर नजर गेली आणि गप्पकन् थांबलोच! समोर नेमके काय आहे हे लक्षातच येईना. जे दिसत होते ते भव्य होते, पण जे दिसत नव्हते ते अधिक भव्य होते. सर्वत्र अंधूक प्रकाश होता. जे दिसत होते तो एक भव्य सभा मंडप होता. त्याची सुरवात जमीनी पासून झाली होती. दगडांच्या देशातील अस्सल अग्नीजन्य खडकांपासून केलेल्या प्रचंड पाय-या, अवाढव्य, आडव्या सत्तर ऐंशी फूट असतील. एकावर एक, एकावर एक अशा किमान साठ फूट उंच अशा. त्यावर जोते. जोत्यावरील प्रचंड दगडी खांब असे मजबूत की प्रलयाला ही पुरून उरतील. त्यावर छत. छत देखील आगळे वेगळे, बारीक वेताचे, त्यावर माडाच्या झावळ्या बांधलेल्या. अंधूक प्रकाशात मंडपाचा हा भाग दिसत होता तर दुसरे टोक दिसतच नव्हते! ते अंधारात गडप झाले होते. त्या मुळे ती वास्तू अधीक भव्य,अधीक गूढ, अंगावर येणारी झाली होती. नजर बंदी करत संमोहनाच्या लहरी अंगावर सोडत होती. मी खिळून जमीनीवर अक्षरश: रुतलो. पुट्टासामी नी ही आ वासला होता.



लिंगभैरवी देवी कडे जातांना.

अंधारया प्रकाशात आम्ही पुढे निघालो. पहिल्या पायरी जवळ येताच नम्र झालो,आदराने झुकलो. वाकून पायरीला हात लावला,त्या अवाढव्य पायरीचा थंड स्पर्श शिरशिरी आणणारा होता,तरीहि आश्वासक वाटला. वर बघताच छताची भव्यता अधिक जाणवली. गुढग्या येवढ्या उंचीच्या पायरया चढून वर आलो. प्रचंड अश्या दगडी खांबांच्या तीन रांगा होत्या. आम्ही सात आठच खांब मोजू शकलो. बाकी अंधारात गडप झाले होते तरी त्यांचे अस्तित्व मात्र जाणवत होते. मी ती भव्यता भारावून बघत होतो. खुळाच झालो होतो. इतक्यात 'ayyo sir, look here' असे किंचाळणे कानावर आले. मी दचकून त्या दिशेने पाहिले. तर पुट्टा उजव्या बाजूला कठडा होता तेथून खाली पहात होता.

मी तेथे गेलो व खुळखुळा (परत परत खुळा ) झालो. सभा मंडपाच्याच उंचीवर त्याला काटकोनात भिडणारी नैसर्गीक दगडी भिंत होती, तिच्यावरून पाण्याचा प्रवाह मजेत कोलांट्या खात खाली उतरत होता. त्याचा नाद संमोहित करणारा होता. तो धबधबा खाली एका बांधीव तलावात सतत पडत होता. खालचा तलाव किंवा कुंड आयताकृती होते. त्यात

तीन शिवलिंगे बुडीमारून बसली होती. त्यांच्यावर तांब्याचे नाग छत्र धरून बसले होते. धबधब्याच्या समोर कुंडाची सुरुवात होती. पाण्यातून भव्य दगडी पायरया वर वर चढत होत्या.

आम्ही सभा मंडपाच्या पायरया उतरून कुंडाकडे गेलो. तेथे एक चबूतरा होता. त्यावर दहा बारा फूट उंच अशी शिळा होती. त्या शिळेवर तीन भीषण नाग आपल्या प्रचंड फणा काढून भयानक मोठे दात विचकत बसले होते. आम्ही दचकून मागे हटलो. पण लगेचच स्वत:ला हसलो. ते नाग ही दगडीच होते. पण किती जिवंत होते. शिळा जेथे चबूत-या वर बसली होती त्या ठिकाणी बरेच तेलाचे दिवे लावले होते. त्या दिव्यांच्या ज्योती हालत होत्या,त्यामुळे ते नाग फणा काढून डोलत आहेत असेच वाटत होते!.

तेथे मस्त स्वर्गीय सुगंधाचा दरवळ येत होता. त्याचे कारण ही कळले. एका वेताच्या परडीत ताजी ‘मल्लीगे’ म्हणजे मोगर्याची फुले भरभरून ठेवली होती. त्यांचा तो धुंद दरवळ होता. त्या सुगंधानेच ते सर्प बंधनात होते,नाहीतर...

भारलेल्या अवस्थेतच परत सभाग्रुहात आलो व अंधारात बुडालेल्या दुसरया टोकाकडे निघालो. जवळ जवळ प्रत्येक खांबाच्या पायथ्याशी काहीतरी हालचाल जाणवत होती. धीर धरून तेथे गेलो तर काही साधक चित्र विचित्र योग मुद्रा किंवा आसनांचा सराव करत होते. त्या मुळे तेथील वातावरण अधिकच गूढ झाले होते. इतक्यात असे काही झाले कि ह्रदयात कळ आली. आसन छान जमल्यावर आनंदाने एका साधकाने खांबा आडून ‘शिवोऽहं’ असा जोरदार हुंकार भरला होता!

हा धक्का किती तरी वेळ मला बिलगूनच बसला. तसाच पुढे निघालो. सभा मंडपाचा शेवट आला एकदाचा. आता पाय-या उतरायच्या होत्या. पण तेथेच थोडासा गोंधळलो. कारण पहिल्या दोन तीन पाय-याच दिसत होत्या,बाकीच्या अंधारात गडप! समोर जवळ जवळ तीनशे

फूट अंतरावर किल्ल्याचीच वाटावी अशी भिंत दिसत होती. त्या भिंतिवरील दिवे लुकलुकत होते. दगडांनी बांधलेली वाट थेट भिंतीकडे जात होती. रस्तयाच्या दोन्ही बाजूस मध्यम उंचीची झाडे होती. धारात त्यांच्या अंधूक आकृत्या जाणवत होत्या. पुढे जावे की नाही? असा संभ्रम पडला. कारण अंधारात काहीच अंदाज येत नव्हता व ते भीषण नाग आठवत होते. नीट पहाता लक्षात आले की,दगडी रस्त्यावरील खळग्यां मध्ये पावसाचे पाणी साचले होते व त्या पाण्यात समोरच्या भिंतीवरील दिव्यांची प्रतिबिंबे पडली होती. हा संदर्भ बघून धीर आला व त्या ओल्या पायरया आम्ही उतरू लागलो. येथे माझ्या लक्षात आले की ह्या टोचे मारलेल्या दगडांवर पाय मुळीच घसरत नाहीत. त्यावर शेवाळे होत नाही. उलट शहरात इमारती भोवती 'टाइल्स" लावतात त्यावरून माणसे व दुचाक्या दोन्ही हमखास घसरतात. इथे सर्वत्र नैसर्गीक वस्तूंचाच वापर मोठ्या कलात्मक पणे केला होता. आम्ही दगडी वाटेवरून पुढे निघालो.

पावसाची रिमझिम चालूच होती,भिजायला लई मज्जा येत होती. समोरील दिव्यां कडे बघत हळू हळू पुढे चाललो होतो. लक्ष तिकडेच होते. अचानक समोर पाच दहा फूटांवर काळा ढग जमीनीवर विश्रांती घेत बसलेला दिसला! कुतूहलाने जवळ गेल्यावर कळले की तो ढग नसून प्रचंड नंदी आहे. काळया पाषाणात घडवलेला भव्य! त्याच्या शिंगांची टोके किमान पंचवीस फूट उंच होती! विशेष म्हणजे इतका मोठा असून देखील तो अतीशय रेखीव व प्रमाण बध्ध होता. आता मी अवाक होणे सोडूनच दिले होते. मी मनात सारखे म्हणत होतो, ज्या वास्तू विशारदाने ही वास्तू रेखाटली तो पक्का पागल असावा. व त्याचा पागलपणा सांसर्गिक असणार,बघणारयाला ही बाधीत करणारा.

त्या नंदी कडे मी बघतांना मी खिळून गेलो. त्याची टोकदार शिंगे,गळयातील घंटीकाच्या माळा, पिळदार स्नायू सर्व अस्सल जिवंत होते. मी हळूच हात लावला व उगीचच शहारलो. पुढे निघालो खरा पण सारखे मागे वळून पहावेसे वाटत होते. प ण अजून खूप बघायचे होते, बरेच धक्के पचवायचे होते.

पुढे खाली उतरण्या साठी पायरया दिसल्या. आत चार पाच लोकं रांगेत उभे होते. तीच शांतता सर्वत्र, बोलायला बंदीच होती जणू. पण ही शांतता हवीहवीशी वाटत होती. ही जमीनी खालील छोटी गुहा होती. भगव्या वस्त्रातील दोन सेवेकरी होते. समोर नैसर्गीक दगडी भिंतीवर नीलगिरी च्या पानाच्या आकाराची शेंदूरचर्चित आकृती दिसत होती. तिची अ र्चना चालू होती. मी त्या सेवेकर्याला हळूच विचारले “which is this gaddess which is this Godess?” ह्यावर तो माझ्या जवळ आला व कानात कुजबुजला“ ‘लिंगभैरवी देवी’” आम्ही देवीचे दर्शन घेतले, कुमकुम लावले व पुढे निघालो. वर एक स्त्री हाताची ओंजळ करून उभी होती. मला वाटले की त्यात पैसे टाकायचे,पण नंतर लक्षात आले की तिच्या ओंजळीत चंदनाची वाटी होती. लोक त्यातील चंदन कपाळाला लावत होते. मी ही तसेच केले. येथे ही प्रकाश क्षीणच होता व शांततेत देवीचे स्तोत्र अतीखर्जात सुरू होते. त्यामुळे वातावरण भारावलेले होते. आम्ही त्याच भारावलेल्या अवस्थेत बाहेर(वर)आलो. समोरच मगाचा नंदी होता. त्याच्या डावीकडे दगडी रस्ता जात होता. त्या रस्त्याच्या टोकाला एक अजस्त्र घुमट दिसत होता. ह्याच घुमटा बद्दल मी वाचलं होतं. तेथे प्रचंड आकाराच शिवलिंग असल्याच मला माहीत होतं. आम्ही तेथे जाण्यास निघालो.

अंधाराची नुसती सवयच झाली नव्हती तर दोस्ती झाली होती. तो नवा भिडू आवडू लागला होता. जस जसे आम्ही घुमटा जवळ जावू लागलो तसतसे वातावरण अधीक गूढ गडद होवू लागले. येथे ही रस्त्याच्या दोन्ही बाजूस बुटकी झाड़े होती, त्यांच्या खाली साधक समाधी लावून अंधारातच बसले होते. तसेच पुढे निघालो. घुमटाची भव्यता आता अंगावर यायला लागली होती. आम्ही नव्या अनुभवाला भिड़ायला सिध्द झालो.

गोल फिरणरा रस्ता अजस्त्र घुमटाच्या प्रवेशद्वारा कडे नेणा -या मुख्य रस्त्याला मिळाला. हा रस्ता अत्ता पर्यंतच्या रस्त्यांपेक्षा वेगळाच होता. पावलांना मउसर वाटत होता. मुख्य म्हणजे त्याच्या दोन्ही बाजूला दिवे लावले होते! इथे मन प्रसन्न करणारा प्रकाश होता. 'असतो मा सत् गमय' चा अनुभव देणारा प्रकाश. मनात आनंदाच्या लहरी जाणवत होत्या. नकळत जप करू लागलो ‘ॐ नम: शिवाय’ व प्रवेश व्दाराकड़े निघालो.

प्रवेशव्दार रूंद पण बुटके होते. त्याच्या पुढे मोठ्या समया लावलेल्या होत्या. जवळ दोन साधक भगव्या वस्त्रात बसले होते. त्यांना नमस्कार करून प्रवेशव्दारात उभा राहिलो. समोर पाहिले, खरच सांगतो,आयुष्यात जी आश्चर्ये बघीतली त्यांच्यावर हा कळस होता. प्रवेशव्दार

बुटके असले तरी चांगलेच रुंद होते. ते रेखीव व कमानदार होते, मी त्या कमानी खाली उभा होतो आणि समोर उंचच उंच अतिशय देखणे शिवलिंग दिसत होते!

काळ्या बहूमूल्य व दुर्मीळ अशा पाषाणात ते नजाकतीने घडवले होते. तो काळा गुळगुळीत पथ्थर कोणत्याही अमूल्य रत्ना सारखाच होता,आणि त्यावर भक्तीचा दरवळ होता. चमकदार गोलाई वर मध्ये तीन चार तांब्याच्या तारांची वेटोळी होती. ती ऊर्जा प्रक्षेपण करित होती. किमान अठरा ते वीस फूट उंचीचे ते ध्यानलिंग खरच अव्दितीय होते.

हे लिंग वासूकी नागाच्या वेटोळयावर स्थित होते. त्या नागाने आपला रुद्रभीषण जबडा उघडला होता व त्याचे डोळे ज्वलज्जहाल आग ओकत होते. अशा कराल नागाला शिवशंकरच खेळवू जाणे. हेच ते अद्‌भूत ध्यान लिंग.



त्या लिंगावर कमरेला कसतो तसे फिकट गुलाबी नाजूक नक्षी असलेले रेशमी वस्त्र कसलेले होते. लिंगावर तसेच नागा वर फुलांचा जाडसर हार घातला होता. लिंगा समोर कमरे इतक्या उंचीचे दोन चौकोनी खांब होते. त्यावर पणत्या तेवत होत्या. दोन खांबा च्या मध्ये नक्षीदार चौकोनी चबूतरा असून त्यावर रांगोळी रेखलेली होती. फुलांची नऊ वर्तुळे काढून त्यावर नऊ निरांजने तेवत होती. लिंगा भवती अनेक सुगंधी फुलांचे जाड रिंगण असून त्यावर असंख्य पणत्याच्या ज्योती लवलवत होत्या.

मी खीळून उभा होतो, नजर ठरत नव्हती. मनात आचार्यां चे शिवाष्टकम् उमटले

‘देवराज सेव्यमान पावनांध्रि पंकजम्

व्यालयज्ञसूत्रंमिंदू शेखरं क्रुपाकरम

शंकराचार्यांनी किती अचूक वर्णन केले आहे,ह्याची प्रचिती आली.

ते ध्यान लिंग ज्या घुमटात होते त्याचे वर्णन करणे आवघड आहे. तो एक सत्तर ऐशी फूट उंच व त्याच व्यासाचा भव्य घुमट आहे. मागे सांगीतलेल्या त्या पागल वास्तूतज्ञाने येथे तर कहरच केला आहे. घुमटा ची आतील बाजू फिकट चपट्या विटांचीच वाटावी अशी बनवलेली आहे. संपूर्ण घुमटभर एक मेकांना समांतर अशा वर्तुळाकार रेघा मारलेल्या आहेत. त्या कडे बघत राहीले तर डोळे जड होवून मिटायला लागतात. ह्या रेषां मुळे तो घुमट अतिप्राचीन वाटू लागतो. कारण अशा पातळ विटांचा काळ खूप जुना आहे. उदा. तथागत गौतम बुध्धाचे जन्मस्थळ लुंबिनी व शुध्धोधनाचा त्याच्या पित्याचा महाल असलेले कपिलवस्तू व कुदान (सर्व नेपाळ मध्ये) येथील बांधकाम असेच आहे. व त्याचा काळ कमित कमी ई. पू. सातशे वर्ष हा सर्व मान्य आहे. त्याही आधी चा काळ , मोहेन जो दडो (ई. पू. 5000 वर्षे) येथेही अशीच बांधकामे आहेत.

त्या घुमटाची आतली बाजू आपली नजर बांधून ठेवते व आपल्याला अलगद पणे प्राचीन काळात घेवून जाते. आपण वर्तमानात रहातच नाही. स्वत:ला विसरणे म्हणजे काय ते मी तेथे प्रत्यक्ष अनुभवले. आपली मनोभूमी ध्यानासाठी नकळत सिध्द होते. आम्ही शिवलिंगाकडे अनिमिष

नेत्रांनी बघतच डावीकडे सरकलो. ध्यानलिंगा भोवती अनेक साधक ध्यानाला बसले होते. ते शरीराने येथे होते पण खरे कुठे होते कुणास ठावूक?

आम्ही खाली बसलो. पुट्टा ही बसला त्याने डोळे मिटले. मी बघतच राहीलो. कारण त्याच्या बसण्याच्या पध्दती वरूनच कळत होते की तो निश्चितपणे रोजच ध्यान करीत असला पाहिजे. मांडी घातल्यावर त्याच्या मांड्या जमीनीला चिकटल्या होत्या. पाठीचा कणा ताठ,हात काटकोनात मांड्यांवर,व तर्जनी व अंगठा जुळवून ज्ञानमुद्रा केलेली. त्याचा श्वास ही लगेच संथ झाला होता.



मी ध्यानाचा प्रयत्नच करत नव्हतो. माझं निरिक्षणच चाललं होतं. ध्यानाला अनेक जण बसले होते. कुणी शिवलिंगाच्या जवळ फुलांच्या वर्तूळा बाहेर तूर्यावस्थेत. काही जण मध्यभागी तर काहीं भिंतीच्या ध्यानासाठीच खास केलेल्या कोनाड्यात बसले होते. आम्ही मध्यभागी बसलो होतो. माझ्या मागे कोनाड्यात(खोबणीत) एक मुलगी बसली होती. तिचा चेहरा शांततेचे मूर्तीमंत प्रतीक झला होता. ते प्रचंड शिवलिंग,पणत्यांची मनोहारी आरास,अत्यंत कमी प्रकाश आणि सर्वात प्रभावी व निर्णायक गोष्ट म्हणजे तेथील भारावून टाकणारी दिव्य शांतता. देवाला वाहिलेले फूल खाली पडले तरी तो आवाज ऐकू येईल अशी अदभूत शांतता! आणि खरच होतं

ते. डोळे मिटून शांत बसलं की ठरावीक तालात टपS क्,      टपS पक् असा आवाज ऐकू येत होता. घुमटांत उंचावर मध्यावर एक चांदीचे जलपात्र लटकत होतं. त्यातून बरोब्बर शिवलिंगावर अभिषेक होत होता. त्या शांततेत हा आवाज चांगलाच मोठा वाटत होता. त्या आवाजाने मला मोहिनी घातली. मी त्यात गुंतत गेलो. मला गुंगी येवू लागली,घुमटाच्या रेषा गरगर फिरू लागल्या, जलपात्र डळमळू लागलं. पिंड प्रखर प्रकाशाने नाहून गेली, उदबत्यांचा,कापराचा,मोगर्याच्या फुलांचा धुंध दरवळ, आचार्यांचे अष्टकम आपोआप चालू झाले,

देवराज,सेव्यमान पावनांध्रि पंकजम. . . . ते थोडे झाले नाही तर मध्येच रावणाचे शिवतांडव स्तोत्र सुरू झाले, प्रवेश व्दारा वरील उंच समयांचा प्रकाश शिवलिंगावर पडत होता, तो अचानक अडला एक भव्य सावली शिवलिंगावर पडली, त्या पर्वतदेही पुरूषाने आपले दोन्ही हात जोडून ते आपल्या शिरावर धारण केले होते. अचानक जाणवले हा तर लंकापती रावण!! तो घनदाट खर्जात शंकरांला विनवत होता,

“ विमुक्त दुर्मतिर् सदा,शिरस्थ अंजलिं ब्रहन्”. . . काय चाललय हे? कसले विचित्र भास होतायत हे? मी  ताळ्यावर येण्या साठी जोर जोरात, नाही, नाही अशी मान झटकली,  थोडा वेळ गेला, आता समयांचा प्रकाश पूर्ववत शिवलिंग उजळून टाकत होता,सावली नव्हती. इतर दिवे सौम्य होते,साधक तसेच तूर्यात होते, शांत घुमटीत जलाभिषेकाचा मंद आवाज तसाच येत होता. मग काही क्षण माला काय झाले होते? काहीही असो रावणाने शंकराला इतके कळवळून म्हटले की माझी दुर्मती दूर कर, तीच प्रार्थना मी केली, व रावणाने पुढे म्हटले तेच मी म्हणत राहिलो,

“ शिवेति मंत्रंउच्चरम सदा सुखि भवाम्यहम्” हाच मंत्र मी जपत राहिलो, डोळे जड,जड होत गेले जीभ ही जड झाली, ॐ नम: शिवाय: चा जप अस्पष्ट होत गेला, व माझी जाणीव ही हळू हळू विरत गेली.

ॐ नम: शिवाय. . .

परिशिष्ट –

जग्गी वासूदेव हे अध्यात्मिक गुरू. त्यांनी ईशा फौडेशन ची स्थापना केली. जगात अनेक ठिकाणी अशी ध्यान मंदिरे आहेत. येथे योग व ध्यान शिकवतात. सदर मंदिर हे कोईबत्तूर शहरा पासून सुमारे चाळीस कि. मि. वर पोंडी (स्थानिक उच्चार बोंडी) नावाच्या गावा जवळ आहे. गुगल वर जग्गी वासुदेव किंवा ईशा फाऊंडेशन टाकून सर्च केल्यास भरपूर माहिती मिळेल.

लेखक – अनिल पाटील, 602,मोरया अँव्हेन्यू, सी विंग,चोगले नगर,बोरिवली(पू) मुंबई,400066.

सहध्वनी क्र. 9619009189.

# क्लेम

दिलिप कोलते

बघा तुम्हाला या क्षेत्रात भरीव अशी काही कामगिरी करायची असेल तर हाताने तुम्हाला भरपूर स्केचेस करणे जरुरीचे आहे. आणि त्यासाठी निरीक्षणही करायला हवे. ते निरीक्षण योग्यप्रकारे केले तर समोरच्या माणसाचा चेहरा सहज वाचता येईल आणि ते करता आलं तर तुम्ही सुंदर चित्र रेखाटू शकता. त्यासाठी गाडी बस रेल्वे बाजार जिथे म्हणून जाल तेथे प्रथम निरीक्षण करा. स्केच काढा मग पहा तुम्हाला कसा आनंद मिळतो तो.

सरांचे शब्द विशाखाच्या कानात घुमत होते. म्हणून आर्ट कॉलेज सुरु झाल्यापासून महिनाभर फास्ट लोकलने अंधेरी—दादर प्रवास करण्याऱ्या विशाखाने आजपासून स्लोने जाण्याचा विचार केला. गाडी प्लॅटफार्मला लागून थांबण्याच्या आधी ती गाडीत कशी गेली तिला कळलंच नाही.

“ऑ, आई गं. पाय दिलास मेली! अंधेरी लोकल नव्हती काय?” चिडून एक बाई.

तिची ट्युब पेटली. आपण चूक केली. बोरीवली—चर्चगेट पकडायला हवी होती.

“मुद्दाम नाही दिला.” चेहरा पाडून विशाखा.

“हा माहीत आहे, माहीत आहे. आता आत जा! आम्हाला उतरु दे.”

मोबाईलमधली कार—रेसींग करत मिळेल तेवढी जागा काढत पुढे सरकली. दरवाज्याजवळ आडव्या उभ्या राहणाऱ्याच्या चौथ्या जागी जराशी टेकून उभी राहिली. गाडी थोडी हिंदकळल्यानंतर तिच्यापुढे असलेली बाई, वरचा हॅंडल पकडला असला तरी बसलेल्या झटक्याने शून्य सेकंदाने पुढे झाली. ती हवेची पोकळी भरुन येण्याआधी विशाखाने त्या पोकळीत आपला श्वास कोंडला. हुश्श्य! फास्ट लोकलचा महिनाभराचा अनुभव सत्कारणी लागला. तिसरीने रागाने पाहण्याअगोदर मान मागे वळवून अनोळखी गर्दीत आपलीपण जानपहेचान असल्याचे भासवलं.

आता जागेवरुन हलायचं नाही. आपल्या डोळयाचा सी.सी.टी.व्ही. कॅमेरा इथेच अनाधिकृत उभारावा आणि नव्या जागेचा शोध घ्यावा. उद्देशीय मचाण बांधण्यासाठी टॉवरच्या ३२ व्या फ्लोअरवरुन आसमंताचं विहंगम दृश्य पाहावं तसा अख्खा डब्बा नजरेखाली घालत होती. निरीक्षणाला सुरुवात, लेडी शेरलॉक्स होम झाल्यासारखं वाटलं. गुरुनी दिलेला निरीक्षणाचा मंत्र डोळयाच्या कॅमऱ्याने पटापट निरीक्षण नोंदवत, उद्यासाठी रिपोर्ट तयार करत होता. वॉ! पटकन हसू फुटले.त्याच्या आवाजाने बाजूच्या बायकांना गोड धक्का बसला.

“अंगावरुन मोरपीस फिरवत असेल कोणी.” एक हळू बोलली पण दुसरी फिस्सकरुन हसली. डब्यात लागण सुरु झाली. रोग चांगला! पण रुजला कुठे कुणाला कळला नाही.दादरला विशाखा नावाचा जंतू बाहेर पडला आणि डबा रोगमुक्त झाला.

गुरुजनांचा आदेश आणि एक दिवसाचा अनुभव हे आर्ट वर्ष निश्चित रंगीबेरंगी करुन जाणार असा विश्वास नोंदवला. माधुरी दिक्षितने प्रेझंट केलेले हास्य कुठल्या गॅगवेमध्ये प्रभावी ठरु शकेल याच्या अंदाजाचे काम डोळे करु लागले. एका दबलेल्या ओठाने मिठास हास्य

करत खिडकीजवळ उभ्या असलेल्या बिपाशा बासूकडे सॅक देवून एक डोळा बारीक करुन हाताने इशारा केला वर टाक.

फुकटचे सल्ले न आवडणाऱ्या बिपाशा बासूने फुकटची हमाली निर्विकार चेहऱ्याने पार पाडली. थोडा वेळ हात अधांतरी ठेवला. सॅकने खालचीचं डोकं फोडलं तर काय घ्या? हा भाव. पण सॅक मस्त विसावली. तिला थोडेच धक्के खायचे होते.

चला, जनगणना सुरु करु! विशाखाचे मन फुलपाखरु बनून सेंटच्या वासात भिरभिरु लागलं.

गुज्जू किंवा भय्या एक भारती रुप खिडकीवर हात ठेवून खाचेत अर्धा फुटाची जागा सोडून सुस्तावली. चौथी सीट; बाजूच्या सिटचा कोपरा हाताने दाबत आपल्या अंगाचा पाव भाग कसातरी टेकवत कसरत करत होती; जी कोणी पाहत नव्हती किंवा इतरांची कधी तरी झाली असेल. विशाखाला हा भाग नवीन असल्याने पाहणे सक्तीचं होते भाग होते.

ती सुध्दा मनातल्या मनात उड्या मारत होती. आपल्याला जमेल, नाही जमेल पाहू ह्या देवी तो अनुभव केव्हा देतात ते. कोणाच्यातरी  मोबाईलची रिंगटोन वाजली. नजर के सामने, नजर के पार, तुम रहते हो.... हो कहॉ कहॉ म्हणत विशाखाने डोळ्याचा कॅमेरा केला.

“कहॉ विलेपार्ले, मेरे लिए.”

“ तु ग? सांताक्रूझ? माझी लाईन ठेव.”

विशाखाने आश्र्चर्याने पंजाबी ड्रेसकडे पाहिलं. मान हलवून विचारल, “क्या?”

“क्लेम लगा रहे है!”

“ व्हॉट इज क्लेम?” पुन्हा विशाखा उत्सुकतेने.

तिच्या इंग्रजीने पंजाबी हादरली.

“क्लेम बस. पयले बतानेका”

“क्या?”

“मैं वहॉ बैठूगी!”

ऑ? विशाखाने मनात आ वासला लेडी शेरलॉक्स होम कोडवर्ड मिळलं.

“काही ठिकाणी पटापट उठाबश्या कां होतात?” आनंद पोटात मावेनासा झाला. पुढील आयुष्यास क्लेम करण्यासारखं काही आहे, नाही? माहीत नाही. पण ह्या ओपन प्लॉटवर क्लेम करता येणार होतं

उद्यापासून ‘मिशन क्लेम’ म्हणजे निवांत निरीक्षण. भरपूर निरीक्षण. बसालो सबको ऑखोमें. कालचे आज पुन्हा प्रक्षेपण, गाडी आली. आपोआप डब्यात ताकासारखं घुसळून गेल्यावर सीटचा लोण्याचा गोळा दिसला. थोडे हास्य, नाजूक मानेचा झटका किंवा नाक उडवणं, ‘खार’

ओ.के. माझ्यासाठी माधुरी कामाला आली. चला तोपर्यंत दरवाज्याचे नेहमीचे पहारेकरी तरी बघू. दोन नाजूक चिमण्याची चिवचिव.

“केव्हा आहे लग्न?”

“पुढच्या महिन्यात.”

“मज्जा आहे लवकरच.”

“चल चावट” दोघी तोंडावर हात ठेवून हसतात. ताराबाई काकदृष्टीने पाहतात, हे त्यांच्या गावीही नव्हतं. विशाखाने नजरेचं पान पालटल, नवीन स्केच करायला. दोघींची निर्विकार नेत्रपल्लवी.

“बच्ची को लेगी आप.”

“हा हा लावो” मुलगी खुप वळवळली.

“क्या नाम है तुम्हारा?”

“मिली”

“मिली चुपचाप बैठी रहो” छोटी ती कसली ऐकते.

“मम्मी, मम्मी”

“बेटा, भीड है कैसे लू?” आईने मीनाकुमारीची सट्टी केली. कोई बात नही आप मेरी जगह बैठो.”

मुलीची आई जागेवर आली. मिलीसे सीट मिली. कोणाचा तरी एफ.. एम. वाजत होता.

“ऑखो ही ऑखोमे इशारा हो गया, बैठे बैठे जीने का सहारा हो गया”

“अग ये, खाली बघ की भाजीला पाय लागतो.”

“मग जरा तिकडे घ्या.”

“अजून किती जागा लागते उभं राहायला?” तिघांची उभी जागा तुम्ही बसून कमवली ती सोडा.”

वाद घालणारी चेहरेपट्टी होण्याअगोदर उतरली.

“काय म्हणता सुश्यामावशी, गवार आहे निवडलेली”

“होय ना देवू”

“द्या”

विना विक्रीकर व्यवहार झाला. विशाखाच्या लक्षात आलं नुसता मुंबईचा डबेवाला टाईम मॅनेजमेंट काय करतो? लेडीज स्पेशलचा डबाही तेवढा कमी धावपळीत कार्यभाग उरकतो.इंग्लंडच्या प्रिन्सच्या कानावर घातलं म्हणजे बायकांचा उत्साह अजून वाढेल.डब्यात बायकांचा मॉल होईल आणि रेल्वेला फायदा, एवढा की लालू किंवा सध्या जो असेल तो मान खाली घालेल. एवढा प्रॉफीट. पुन्हा माधुरी तोंडावर पसरली.

एक उतारवय सीटजवळ सरकलं. गुडघेदुखी असावी. कळवळून ती खाली बसली. तिसऱ्या सीटच्या देवीकडे याचना केली. पण आपल्या सौंदर्याने डब्यातील बायका मुर्च्छीत होवून पडू नये किंवा उतरण्यास विसरु नयेत, म्हणून तोंडावर बांधणीचा दुपटा गुंडाळून डोळयांवर सत्तरीचा फिल्मी गॉगल लावून झाकलं होतं.

“तब्बेत बरी नाय. जरा बसू दे. पुढं उतरणार हाय”

“अभी नीचे बैठी हो ना, बैठी रहो” वयाने मान खाली घातली. विशाखाने वयाच्या दंडाला धरुन आपल्या जागी बसवून क्लेम तिच्या नावे केला. वय तोंडभरुन हसलं, थरथरता हात उचलून मूक आशीर्वाद दिला. क्लेमचा आतिरिक्त बोनस विशाखाच्या आयुष्यात जमा झाला. डोळयात पाणी आणून ओठावर माधुर्य पसरवलं.

पप्पांनी दिलेल्या संस्कार मनाच्या वहीवर बरीच स्केचेस केली. ती भरली. आता स्वत:च्या मनाच्या वहीवर नवीन स्केचेसची सुरुवात करायची. कोडवर्ड ‘क्लेम’ करायला मिळाला तर तो उतारवयाकडे सुपूर्द करायचा. पण आपल्यासाठी सोडायचा, कायमचा क्लेम.

# झुळुक

श्री भगवान किसन सानप

दिवाळीच्या सुटटीत आम्ही गावी गेलो . गावी भाऊ रामा , त्याची पत्नी सखुबाई आणि वयोवृध्द आई वडिल राहतात . मी नौकरी निमीत्त बाहेरगावी आल्यापासून त्यांच्या पासुन दुरावाच झाला . मी त्यांना ना पैसे पुरवतो , ना कधी कपडे लत्ते घेतो . त्यामुळे त्यांना माझ्याकडून फायदा तर काहीच नाही , परंतु तरी त्यांना आम्ही सगळयांनी भेटण्यास यावे, अशी त्यांची अपेक्षा . मी वर्षातून दोनदाच गावी जात असे . एकदा पैसे घेण्यासाठी आणि दुस-यांदा दिवाळीला . माझ्या वाटयाला मिळालेली जमीन लहान भाऊ करतो आहे . आई वडिलांना पण तोच सांभाळतो .

आम्ही मुलांना घेवून गावी आलो . तसं पाहिलं तर ती एक फॉरम्यालिटीच पूर्ण करायची होती . दिवाळीचं पण निमीत्त होतं , शिवाय भाऊबंध पण आई वडिलांना टोमणे देऊ नये, म्हणुन आलो होतो , कारण ते नेहमी आईला जणु आगीत तेल ओतल्यागत हिणवत असे की ,

" कदी ढुंकून तरी पातो का तुमच्याकडं? , मस कौतुकांन सांगत्ये , मोठ्ठा साहयोब हे त्यो ."

आम्ही आरामशिर जेवढी उशिरात उशिरा जी गाडी होती , त्या गाडिनं चार वाजता गावी पोहचलो . रस्त्यात अगोदर आमचं खळं लागलं . भाऊ खळयात बाजरी तयार करत होता . तो बाजरीच्या भुशीनं पूर्ण माखलेला दिसत होता . ते दृष्य पाहून मला एकदम लहानपणची आठवण झाली . तेंव्हा मी बाजरी तयार करण्याच्या वेळेस मुददाम अभ्यासाचं नाटक करून पळ काढत असे, कारण बाजरीच्या भुशीनं अंगाला खुप खाज सुटायची , अशावळी माझी बाजू आई घ्यायची . त्यावेळी आई वडीलांना समजावत असे, "अवोऽऽऽ आज त्याला मास्तरनी की नई , लई अब्यास दिलाय हो . नई केला तर मास्तर म्हनला दाहा-दाहा छेडया मारील ."

"अवं ,पोरगं सकळी च्याहा घ्यातल्या पासून अब्यास करतयं ." आईचं बोलणं वडीलांना बरोबर समजायचं . त्यामूळे ते मला गुरं चारायचं काम देत, कारम की गुरं चारता चारता अभ्यासपण करता येवु शकतो हे तंत्र वडीलांना बरोबर माहीत होतं . वरतून त्यांची तवी असायची, " नुसता अब्यासचं नको करत बसू , त्या नादात ढोराकडं दुरलक्ष करू नको . नई तर त्यो गुलाब्या मिस्तरी सांच्याला माराया येइल ." या आठवणी एकापाठोपाठ ताज्यातवाने डोळयासमोर येत होत्या . समोर रामाला भुशीनं माखलेला पाहून माझ्याही अंगावर काटे उभे राहिले . परंतू त्याला मात्र सवय झाली होती .

येणा-या प्रत्येक वा-याच्या झुळकी कडे त्याचं लक्ष होतं . झुळुक आली की लगेच तो हातातील मदनाची पाठी तिरपी करून उपनत होता . त्यातून बनग्या वा-याने उडुन जात होत्या तर बाजरीचे दाने खाली शिल्लक राहात होते . आई घोळानं उडून न गेलेल्या बनग्या बाजुला करत होती .

आम्हाला पाहुन त्याची ऊघडी नागडी पोरं त्यांच्या आईच्या पदरा आड लपली . परतू लगेच तीने तेवढयाच त्यांना दुर ढकलले आणि म्हणाली , "आरे येडयांनो , ते आपले नाशिकचे आन्ना हे , येवढं काय घाबरत्या? ते का तुमाला खात्या का?"

रामाने तिच्या बोलण्याकडं दुर्लक्ष करत मला विचारले, " आन्ना , लई टाईम लावला यायला ?

बाई , सकाळ पासुन सारखी वाटाकडं येणा-या समदया गाडयांची वाट पाहयाची , हया गाडीतुन

उतरलं त्या गाडीतुन उतरल, एकची गाडी गेली, दोनची...... .तिनची गेली तरी काही येईना म्हणुन कंटाळलो ." मला माझ्या अंगावर बनग्या पडल्या सारखं झाल ! काय बोलावं सुचेना? भांबाऊन गेलो , म्हणालो ," काय झालं, सकाळी थंडी असल्यामूळे घरातून ही लवकर निघानां , त्यात सासुर वाडीला पण गेलो होतो . त्यामुळे थोडा उशिरच झाला ."

आई धान्याच्या राशीवर घोळ मारण्याचं सोडून धावतच आली . पोरांचे पटापटा घेतले . माझा पण मुका घेतला . मला बायको समोर लाजिरवाणं झालं , परंतु आईचा तो प्रेमाचा मुका होता . तिच्या आनंदाला पारावार राहिला नव्हता . तिच्या डोळयातुन आनंदाश्रू वाहु लागले . रडण्याच्या सुरातच म्हणत होती, " अरं येडयाSSS ... वरसातनं योतो...... , ते बी येळंवर येत नई... . . वाट पाहून पाहून पार डोळयांची खासंडं जाली ."

आईच बोलणं ऐकुन माझा पण उर भरून आला . डोळयात अश्रुतरळू लागले . तेवढयात रामाने आईला दरडावले , " आता काय इथंच समदं बोलती व्हय , तो लावंण आलाय सकाळ पासुन जेवाणं केलं नसलं , घरी ने चाबीहा करं, आमी दोघं वा-याची झुळुक हे तोपरयत उपनतो ."

आईनं भुशीनं भरलेलं लुगडं झटकलं . डोळे पुसले. सुनाला व नातवांना म्हणाली , "चाल गं उरमिले, परवासनं थकली आशिल ? तूला चाहा करते , तेवढाच तूझा आन पोरांचा शिणभाग जाईल ." आई साठ वर्षा ची म्हातारी असुन सुध्दा स्वंयपाक व शेतीची कामे करत होती . तिला कोणत्याही माना पानाची अपेक्षा नव्हती . काम करनं हेच तिला माहिती होतं . त्यामूळे रामाला पण कामात आईची मदत होत होती . रामाचे मूलं साभाळनही आईच करत होती . त्यामूळे मूलं पण आईच्या मांग आली .

आम्ही सर्वजण घरी आलो . आईनं रामाच्या मुलांच्या नाकाचा शेबुंड पुसला . त्यांच्या अगांत कपडे घातले . ती मुलं कपडे घालत नव्हती परतूं आईनं त्यांना माझा धाक दाखवला ,"तुमी जर कपडे घातले नई तर ,

आन्ना तुमाला खाऊ दयानार नई बरऽऽ ? ." त्यामूळे ते पटकण तयार झाले .लगेच सौ नं बॅग मधुन पेढयांचा बॉक्स काढला . पेढे अगदी मोजून मापुन आणले होते . प्रत्येकी दोन या प्रमाणे आमच्या सहित सगळे दहा जण होते . त्याप्रमाणे अर्धा किलो पेढे विकत घेतले होते .

मला वडिल दिशेना म्हणुन आईला विचारले , "काय गं आई , दादा काही दिसत नाही कुठे गेले?"

"अरं बाबा ! ढोरं वळाया गेली ."

" चार दिसा पासुनं खळयात रामा , सकीऽऽ अन मी सारखं बाजरी उपनतेय"

"वारं लागत नई , साधी झुळुकंही येत नई ."

"येक येक पाटी करता वाट पाहया लागती बग ."

"तवा रामा म्हणं दादा तुमी ढोरा मागं जा ."

"तवा त्यासनी पण मुकाटयानं जावं लागलं "

"वय झालं ! तुझ्या दादानां आता काम होत नई बग ."

"तरिपण तुमच्या साठी करत्याय"

"नाय केलं तर रामा म्हणतो , जा त्याच्याकडं नाशकाला"

"तु बी आमच्या कडं पाहत नई"

"तुझे दादाच्या जिवाला लई घोर हे बग ."

"वय झालय तरी ढोरामागं जावं लागतं"

"एकटया रामाला पण एवढं काम औरत नई ."

"त्यामूळं तुझ्या दादाला पण काम करावं लागतं . कसं तरी त्याच्या मागं उभे हे "

आई परत रडु लागली . रडत रडत चुलीत लाकडं घालत होती . चुलीतनं धुर येत होता . आई पदरानं डोळे पुसत होती .इकडं मुलांच्या व बायकोच्या डोळयातनं पण अश्रू येत होते , आई आमच्यासाठी जो चहा बनवत होती ; त्यामूळे चुलीतंन जो धुर निघत होता, त्या धुरामूळे सगळयांच्या डोळयातून पाणी येत होतं . कसा बसा आईनं चहा तयार केला . तो पर्यंत बायकोने डोळे चोळत चोळत पेढे वाटणे सूरू केले . परंतू रामाचे मुलं पेढे घेई

ना? तेंव्हा आई म्हणाली, “ आगंऽऽ . .ते तुला घाबरत्या , त्यांची न तुजी ज्यादा ओळख नई ना! म्हणून तुझ्या हातुन नई घ्याणार ते , दे माजाकडं मी दयाते त्यांना माजा हातुन घ्येतीलं बग .”

किती हा विरोधाभास होता ! एकाच कुटूंबातील असुन सुध्दा गावाकडं येणं-जाणं कमी असल्यामुळं त्याना आम्ही परकी वाटत होतो .

आईच्या हातुन त्यांनी पेढे घेतले आणि अधाशा सारखे क्षणात दोन पेढे फस्त केले . अजुन पेढयांची त्याची अपेक्षा होती पण काही न बोलता ती गप्प होती .

मी आईला म्हणालो , “ आई , रामाला व सखुला पण चहा पिण्यास बोलव .”

तेव्हां आई म्हणाली , “मी त्यासनी खळयातच चाहा निवुन देते . आता झुळकी चांगली चालू हे . तोवर ते इकडं येणार नई .”

“काय करणार ! दोन दिसा पासुनं सारखा उभा हे त्यो .”

“वारं लागत नई .”

“अेका अेका झुळकी करता वाट पाहया लागती . ”

दिवाळी असुन याना नसल्यासारखी होती . असं म्हणतात ना... की शेतकरी , ‘कामाच्या वेळेला मुरदा झाकून ठेवीन परंतू काम बंद करणार नाही .’ त्याप्रमाणे रामाला पण वाटायचं आमच्यात बसावं , गप्पा माराव्या पण तो बसू शकत नव्हता . वा-याची झुळुक यावी म्हणुन रामा तासनं तास वाट पाहात होता . झाडाची पानं हालली की लगेच त्याला समजायचे की झुळुक आली . लगेच त्याचे काम सूरू व्हायचे .

समोर धान्याची रास अगदी कमी दिसत होती . तर बनग्यांचा ढिग डोंगरा एवढा दिसत होता . जणू काहि ‘डोंगर पोखरून उंदिर काढल्या सारखे होते’ . इकडे आम्हाला सिमेंटच्या जंगलात कधी वा-याच्या झुळकीचे एवढे महत्व कळालेच नाही . आम्हाला पंखा व एसीची सवय झाल्यामळे जेव्हा पाहिजे तेव्हा बटन दाबून हवा(झुळुक) घेत होतो . नैसर्गिक झुळुक घेण्याची आमची सवयच मोडली होती . परंतू रामाला मात्र या झुळकी पायी चार दिवसापासून खळयात काम करत रखडावे लागत होते . अगदी देवा सारखी वाट पाहात होता . मी रामाला न राहवून प्रश्न केला की , “ काय रं ! रामा , धान्य फार कमी आणि बनग्याच जास्त दिसताता , का बरं असं झालं ?”

त्यावर तो म्हंणाला , “काय करणार , अैन चिकात बाजरी आसतांना पावुस लांबला . त्यामूळं कणसं निसती मुकीच रायली . दाने भरले नई .” “शेतक-याचं सगळं त्याचावरच आवलनबून रातं बग . त्यो चांगला पडला तर बरं...... नई तर कोल्हे , कुञ्यावाणी हाल होत्यात . आवंदाच वरीस लई कठीन हे .”

शहरात दिवाळीला फटाकडयांच्या आवाज नको होतो . इतकी फटाकडे वाजवतात . परंतू इकडं गावी मात्र अगदी तासाला कोठुन तरी बारीक आवाज यायचा . तो ही लवंगी फटाकडयाचा किंवा टिकल्यांचा असायचा . याला कारण म्हणजे समाधान कारक पाऊस न झाल्यामूळे शेतक-यांच्या तोंडचे पाणी पळाले होते . आनंदाचा सण असुन सुध्दा सगळी कडे निराशाचे ढग पसरले होते . गूरां-ढोरांच्या अंगावर मास राहिले नव्हते . पोटं पार खपाटाला लागली होती . बाजारात गुरं कमी भावात कसायला विकली जात होती . जो तो ढोरं विकीला आणत होता . कारण माणसांनाच धान्य पुरेल याची शास्वती नव्हती . तेव्हा गुरांना चारा कुठून आनणार? काही लोक आपली गुरं परगावी पाठवत होती . ‘माय लेकराला धरे ना!’ असी परिस्थिती निर्माण झाली . सावकराकडे

लोकांच्या चकरा सुरू झाल्या . कोणी गाय विकुन , कोणी धान्य विकुन तर कोणी सावकराकडून व्याजाने पैसे काढुन दिवाळी साजरी करीत होते .

किती हा बदल होता! एकीकडं मोठया आवाजाचे फटाकडे वाजवु नका म्हणुन सरकारला सांगवं लागंत , तर दुसरीकडं शोधुन आवाज ऐकायला येत नव्हता .
त्यामुळेच की कोणास ठाऊक ? आमच्या सचिन ने मला प्रश्न विचारला , "पप्पा , तुम्ही म्हणाला होता की आपल्याला दिवाळीसाठी गावी जायचे , इकडे दिवाळी नाही का ?"
मला काय सांगवं हा प्रश्न पडला ? विचार करून म्हणालो , " आरे वेडया इकडं पाऊस न पडल्यामुळे धान्य पिकलं नाही . त्यामुळे त्यांना फटाकडे घेण्यास पैसे नाही . म्हणुन ते फटाकडे वाजवत नाही ."
"पप्पा ,पप्पा तुम्ही लहानपणी इथंच राहात होते का होऽऽऽ ."
'हो' ,
"छे...छे किती घाणेरडं घर आहे !"
आपण ना पप्पा इथं नाही राहयचं आपण संजु मामाच्या कडं जावू त्यांच फार सुदंर घर आहे ."
मी त्याला दरडावुन म्हंणालो , " नाही , आपल्याला आज इथंच राहाव लागेल . अजुन बाबा गुरं चारून परत आले नाही . त्यांना आपल्याला भेटायचे आहे ."
मला राग आला आहे हे सचिनने ओळखले . तो गप्प झाला . परंतू आमच्या सौ चे डोळे मात्र माझ्याकडं वटारले होते .
" जाउ दया हो , तो अजुन लहान आहे . त्याला काय कळतं?" ती म्हणाली .

संध्याकाळी दादा गुरं चारून आले . फार थकलेले दिसत होते . पाठीत वाक आलेला होता , संपुर्ण केस सफेद झालेले होते .पायात टायरच्या चप्पला, दाढी वाढलेली होती . आंम्हाला पाहुन त्यांना आनंद झाला . तो त्याच्या चेह-यावरून लपला नाही . आम्ही बाहेर खाटावर बसलो होतो . मी आणि ऊर्मिलां दादांच्या पाया पडलो . दादांनी आम्हाला सुखात राहा... असा आर्शिवाद दिला .

एवढे सर्वांचे प्रेम पाहून मी आचविंतच झालो होतो . मला राहून राहून सारख वाटायचं आपण घरापासुन दुर राहिलो हि फार मोठी चुक केली. जर आपणही झुळुक होवून सर्वांचा आनंद व्दिगुणित केला तर............

श्री भगवान किसन सानप

ड्रिम प्रेसिडेन्सी, ब -8,

विध्यानगरी , जेलरोड,

नासिकरोड , नासिक .

मो . 8275273287